**राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत मौजे लासलगांव, ता. निफाड, जि. नाशिक येथील शिव नदी संवर्धन प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रानयो २०२४/प्र.क्र.७७/आस्थापना अ**
नवीन प्रशासकीय इमारत, १५ वा मजला
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक - १६ मार्च, २०२४.

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकः- संकीर्ण २०११/प्र.क्र. २५/तां.क.१, दिनांक १/०३/२०१४.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक यांनी दि.२२.११.२०२३ रोजीच्या पत्रासोबत सादर केलेला प्रस्ताव.
३) सचिव प्रदत्त समितीच्या दि.३०.०१.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना-</u>

राज्यातील नद्यांचे पयावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य नदी संवर्धन योजना दिनांक ०१/०३/२०१४ रोजीपासून सुरू केली आहे. या योजनेतंर्धत सर्वसाधारणपणे खालील कामांचा समावेश होतो.

१) शहरातून / गावातून निघणारे सांडपाणी नदीत ज्या ठिकाणी सोडले जाते (Point Source) तेथून गोळा करणे, अडविणे, वळविणे व सांडपाणी प्रक्रिया यंत्रणेपर्यंत पोहचविणे इत्यादीसाठी उपाययोजना यामध्ये शहराच्या भुयारी गटार योजनेचा समावेश नाही.

२) सांडपाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी सांडपाण्याचे प्रमाण, गुणवत्ता व स्थानिक भौगोलिक परिस्थिती लक्षात घेऊन योग्य तंत्रज्ञानावर आधारीत सांडपाणी प्रक्रिया यंत्रणा व त्यास अनुषंगिक आवश्यक घटक इत्यादी उभारणे.

३) प्रक्रिया केलेल्या सांडपाण्याचा प्रकल्पक्षेत्रातील किंवा जवळील शेती, उदयोगघटक, बागबगीचे इत्यादीमध्ये पूर्नवापर व पुर्नचक्रण शक्य होण्यासाठी आवश्यक ती यंत्रणा सुविधा/व्यवस्था इत्यादी उभारणे.

४) नदीच्या जवळील भागात स्वच्छतागृहे बांधणे, त्यामधून निघणारे सांडपाणी मलशुध्दीकरण यंत्रणेस जोडणे वा प्रक्रियेसाठी तत्सम उपाययोजना करणे इत्यादी.

राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक यांच्याकडून प्राप्त मौजे लासलगांव, ता. निफाड, जि. नाशिक येथील शिव नदीचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्याच्या एकूण १५.७२ कोटीचा प्रस्ताव दि.३०.०१.२०२४ रोजी झालेल्या प्रदत्त समितीच्या बैठकीत चर्चेसाठी व मान्यतेसाठी ठेवण्यात आला होता. प्रदत्त समितीच्या शिफारसीनुसार शिव नदी संवर्धनाचा एकूण रु. १३,१२,२३,८७८/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरण वा तत्सम संस्थेच्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार शिव नदी प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य नदी सवंर्धन योजनेतंर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक यांच्याकडून प्राप्त शिव नदीचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धनासाठी सविस्तर प्रकल्प अहवालानुसार सोबत जोडलेल्या "प्रपत्र - अ" मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रुपये रु. १३,१२,२३,८७८/- (रूपये तेरा कोटी बारा लक्ष तेवीस हजार आठशे अठ्ठ्याहत्तर फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व सोबत जोडलेल्या "प्रपत्र - ब" मधील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूर एकूण रकमेपैकी ८०% हिस्सा राज्य शासन व २०% हिस्सा लासलगांव ग्रामपंचायत यांचा राहील.

| अ.क्र. | हिस्सा | मंजूर निधी (रूपये) | अक्षरी मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १) | ८०% राज्य शासन | १०,४९,७९,१०२-/ | रूपये दहा कोटी एकोणपन्नास लक्ष एकोणऐंशी हजार एकशे दोन फक्त |
| २) | २०% लासलगांव ग्रामपंचायत | २,६२,४४,७७६-/ | रूपये दोन कोटी बासष्ट लक्ष चौरेचाळीस हजार सातशे शहात्तर फक्त |
| एकूण | | १३,१२,२३,८७८/- | )रूपये तेरा कोटी बारा लक्ष तेवीस हजार आठशे अठ्ठ्याहत्तर फक्त( |

अ) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक यांनी प्रदत्त समितीपुढे सादर केलेल्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरण वा तत्सम संस्थाकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. त्यानंतरच तांत्रिक मान्यता प्राप्त प्रस्तावास टप्प्याटप्प्याने निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

आ) एकूण मंजूर निधीपैकी २०% हिस्सा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या नावे असलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा केल्यानंतरच शासनाचा ८०% हिस्सा वितरीत करण्यात येईल.

२. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१९३१२४०००४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.18 11:17:46 +05'30'

**(सु.कि. निकम)**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर.
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई.
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.निवडनस्ती.

शासन निर्णय क्रमांक - रानयो २०२४/ प्र.क्र. ७७/आस्थापना अ, दिनांक १६/०३/२०२४ सोबतचे

"प्रपत्र - अ"

| Sr. No. | Activity | Costing (INR) |
|---|---|---|
| 1 | Cleaning and grubbing for 3 Km length of River | 48,83,652.00 |
| 2 | Existing Ghat repairing and Colouring | 50,60,998.92 |
| 3 | Solid waste bio mining plant (100 TDP) for existing leagacy waste including operation and maintenance | 1,46,00,000.00 |
| 4 | Plastic waste recycling plant | 12,68,500.00 |
| 5 | Sewerage system (MMBR STP 3MLD, SPS) | 6,33,00,000.00 |
| 6 | Underground Sewer line 3 km and Inspection manhole | 1,29,00,000.00 |
| 7 | Toilet Block (2 Nos.) | 11,17,652.00 |
| 8 | Oxygen booster plantation(1000nos) including 3yrs maintenance. | 12,38,146.85 |
| 9 | Screening of plastic waste and solid waste machineries (2 Nos.) | 39,79,276.30 |
| 10 | Solar street light (50 Nos.) | 28,58,450.00 |
| | **TOTAL** | **11,12,06,676.07** |
| 11 | GST 18% | **2,00,17,201.69** |
| | **Total** | **13,12,23,877.76** |
| | **Say** | **13,12,23,878.00** |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.18 11:18:03 +05'30'

(सु.कि.निकम)

सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग

महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्रमांक - रानयो २०२४/ प्र.क्र. ७७/आस्थापना अ, दिनांक १६/०३/२०२४ सोबतचे**

**"प्रपत्र - ब"**

**राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत मौजे लासलगांव, ता. निफाड, जि. नाशिक येथील शिव नदी संवर्धन कामांसाठीच्या अटी व शर्ती.**

१. प्रपत्र - अ मध्ये नमूद कामांना प्रथमत: महाराष्ट्र जीवन प्राधिकरण वा तत्सम संस्थेकडून तांत्रिक मंजूरी प्राप्त करुन घेण्यात यावी. तांत्रिक मान्यतेमध्ये प्रपत्र - अ मध्ये नमूद विषयवार असलेल्या खर्चाच्या किमतीत बदल होत असल्यास त्याबाबत विभागास अवगत करण्यात यावे. योजनेच्या प्रत्येक टप्प्यात हाती घेण्यात येणाऱ्या कामाचे मंजूर तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रके, नकाशे, संकल्पचित्रे इ. शासनाकडे काम सुरु करण्यापूर्वी सादर करणे बंर्नकारक असेल. शासनास उपरोक्त माहिती सादर केल्यानंतरच कामे सुरु करण्यात यावीत. हाती घेण्यात यावयाच्या ("प्रपत्र-अ" मध्ये नमूद कामे) कामासंबंधित नदीच्या सद्यस्थितीची छायाचित्रे घेण्यात यावी. तसेच व्हीडीओ रेकॉर्डींग करण्यात यावे. कामांच्या प्रगतीनुसार दर दोन महिन्यांनी याप्रकारे छायाचित्रण करण्यात यावे.

२. नदी संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधित तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था/ शासकीय प्राधिकरण/ मंडळ यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांनी विहित पद्धतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी. एस. आर. प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. जिल्हा परिषदेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

३. सदर प्रशासकीय मान्यतेच्या एकूण रकमेपैकी ८०% हिस्सा राज्य शासन व २०% हिस्सा लासलगांव ग्रामपंचायत यांचा राहील. लासलगांव ग्रामपंचायत यांच्या २०% हिश्याबाबत ग्रामपंचायतीने शासनाकडे सादर केलेल्या ठरावाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वितरित केलेल्या निधीच्या विहित प्रमाणात लासलगांव ग्रामपंचायत यांनी त्यांचा अनुज्ञेय हिस्सा जिल्हा परिषदेच्या स्वतंत्र खात्यात जमा करावा. सदर हिस्सा प्रकल्पावर खर्च केल्याशिवाय तसेच, प्रकल्पांतर्गत होणा-या कामांचे गुणवत्ता लेखापरिक्षण केल्याशिवाय पुढील हप्ता मुक्त करण्यात येणार नाही.

५. कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याची व कामाची गुणवत्ता राखण्याची संपूर्ण जबाबदारी ही मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांची असेल. सदर प्रकल्पाच्या कामासाठी लागणारा निधी खर्च करताना मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांच्या देखरेखेखाली करण्यात यावा.

६. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प अंमलबजावणी समितीची मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या

समितीत जिल्हा परिषदेतील संबंधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेचे प्रतिनिधी यांच्यासह जिल्हा परिषदेस आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला आयोजित करण्यात यावी.

७. नदीच्या निळ्या व लाल पूररेषेच्या दरम्यान काही कामे प्रस्तावित असल्यास सदर कामे करण्याकरिता सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्व परवानगी घेणे बंधनकारक आहे.

८. प्रकल्प पूर्ण झाल्यावरही प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या मदतीशिवाय नदीचे संवर्धन होणे गरजेचे असल्याने योजनेची कामे पूर्ण झाल्यावरही ही समिती बैठका आयोजित करेल. ही समिती भौतिक बाबींची देखभाल, प्रकल्पांपासून मिळणारे उत्पन्न, प्रकल्प संवर्धनासाठी उपाययोजना व खर्च याबाबत आढावा घेत राहील.

९. काम पूर्ण झाल्यावर किमान पुढील १० वर्षापर्यंत नदीची देखभाल व दुरुस्ती जिल्हा परिषदेने स्वखर्चाने करावयाची आहे. तसेच जिल्हा परिषदेने प्रकल्प अंमलबजावणी समितीचा अहवाल प्रत्येक ६ महिन्यांनी शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करेल.

१०.नदीच्या पाण्याची गुणवत्ता चालू महिन्यापासून पुढे प्रत्येक महिन्याला तपासण्यात यावी. पाण्याची गुणवत्ता तपासण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञ प्रयोगशाळेची /संस्थेची /मंडळाची नियुक्ती करण्यात यावी. दर महिन्याचा पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल सदर संस्था प्रकल्प सनियंत्रण समितीस व पर्यावरण विभागास दर तीन महिन्यांनी सादर करेल.

११.उपरोक्त मुद्यानुसार केलेल्या कार्यवाही प्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक हे शासनास दर तीन महिन्याला खालील अहवाल सादर करतील.

अ. मंजूर कामांचा भौतिक प्रगती अहवाल

ब. पाण्याच्या गुणवत्ता अहवालाच्या प्रती

क. प्रकल्प सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

ड खर्चाचे प्रत्येक तिमाहीचे उपयोगिता प्रमाणपत्र

१२.सदर अहवाल सादर केल्याशिवाय कामाच्या पुढील टप्प्यातील निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तसेच आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १० तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपरोक्त मंजूर योजनेसाठी निधी उपलब्धतेनुसार अनुदान मुक्त करण्यात येईल.

१३.योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा जिल्हा परिषदेच्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही. विशिष्ट कामासाठी मान्य केलेल्या

खर्चापेक्षा जास्त खर्च झाल्यास त्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांची राहील.

१४. या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयकृत बँकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बँकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक यांच्याव्दारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बॅकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

१५. योजना पूर्ण झाल्यावर या योजनेंतर्गत निर्माण झालेल्या मालमत्तेपासून किंवा सोयीसुविधांपासून मिळणारे उत्पन्न हे या योजनेसाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यातच जमा करण्यात यावे. या उत्पन्नातून नदी संवर्धनासाठी अतिरिक्त कामे राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या अनुमतीने हाती घेता येतील. मात्र नदी संवर्धनाच्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामासाठी हा निधी वापरता येणार नाही.

१६. मंजूर बाबीतील खर्चामध्ये बचत झाल्यास बचत झालेला निधी योजनेतीलच दुस-या उपांगासाठी राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगीने वापरता येईल.

१७. नदीच्या दोन्ही बाजुला वनीकरण(Tree plantation/ Afforestation) करतांना स्थानिक झाडांच्या लागवडीसह शासनाचे विविध अभियान/ उपक्रम यांचे उद्दिष्ट्ये साध्य होतील-जसे Bomboo Mission, Miyawaki Plantation अशा पद्धतीने वनीकरण करण्यास प्राधान्य देण्यात यावे. तसेच जमिनीची धूप रोखण्यासाठी आणि काही प्रमाणात नैसर्गिकरित्या जलशुद्धीकरणासाठी खस/वाळा (Vetiver), कर्दळी (Canna), शेवगा (Moringa) इ. स्वरूपाच्या वनस्पतीची लागवड समावेश करण्यात यावा.

१८. राज्य नदी संवर्धन योजनेंतर्गत निर्माण केलेल्या यंत्रणेच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च योजना कार्यान्वित झाल्यानंतर संबंधीत जिल्हा परिषदेच्या स्वतःच्या निधीतून भागावावयाचा आहे.

१९. योजनेंतर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याव्दारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा. तसेच प्रत्येक आर्थिक वर्षा अखेर झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीत महालेखापाल कार्यालयास पाठविण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक राहील.

२०. नदीच्या कामांच्या प्रगतीच्या अहवालाची तसेच खर्चाच्या विवरणपत्राची पर्यावरण विभागाच्या सक्षम अधिका-यांकडून तपासणी करण्यात येईल व तपासणीच्या वेळी जिल्हा परिषदेने आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

२१. योजनेवरील कामासाठी मान्यता प्राप्त झालेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च झालेली रक्कम शासनाकडून उपलब्ध होणार नाही. या कामासाठी शासनाने अदा केलेली रक्कम जर त्या कामावर घालून दिलेल्या विविक्षित वेळेमध्ये खर्च होऊ शकत नसेल तर त्यास राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक असेल.

२२.योजनेवरील कामासाठी अदा केलेली रक्कम योग्यरितीने वापरली जात नाही किंवा कामाची योग्य ती प्रगती होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आल्यास शासन कोणत्याही क्षणी अशा कामांची प्रशासकीय मान्यता रद्दबातल करु शकेल.

२३.योजनेवरील कामांसाठी राज्य शासनाच्या अनुदाना व्यतिरिक्त शासनाकडून, वित्तीय संस्थांकडून वा आणखी कोणत्याही संस्थांकडून प्राप्त निधी या योजने अंतर्गत खर्च झाल्याचे दर्शविण्यात येऊ नये. (No Overlapping of schemes)

२४.योजनेचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्यासाठी भेट देणा-या राज्य शासनाच्या अधिका-यांस आवश्यक त्या सर्व प्रशासकीय सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक असेल.

२५.योजनेंतर्गत शासनाच्या अनुदानातून तयार केलेली मालमत्ता, ज्या कामासाठी निर्माण केली आहे, त्याच कामासाठी वापरणे आवश्यक आहे व त्यासाठी ही मालमत्ता अभिलेखित करणे आवश्यक आहे.

२६.योजनेंतर्गत करण्यात येणा-या निरनिराळया कामांचे व समन्वयाचे काम राज्यस्तरावरील सनियंत्रण समितीव्दारे करण्यात येते. या समितीने कामाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक असेल.

२७.योजनेंतर्गत जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेव्दारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

२८. योजनेंतर्गत करण्यात येणाऱ्या कामांचे अभिलेख व छायाचित्रांसह पुरावे जिल्हा परिषदेने जतन करावेत. तसेच सदरबाबत अभिलेखामध्ये नोंद करुन ठेवावी.

२९.नदी संवर्धनाबाबत मंजूर कामांमध्ये नदीतील गाळ काढणे व सिल्ट ट्रॅप लावण्याच्या कामाचा समावेश असल्यास, नदीच्या गाळ काढण्याच्या कामाबरोबरच तसेच पावसाळयापूर्वी सिल्ट ट्रॅप लावण्याचे काम पूर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा नदीत पुन्हा गाळ जमा होऊ शकतो.

३०.नदीच्या कामास सुरवात करण्यापूर्वीची छायाचित्रे विभागास सादर करावीत.

३१.राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तीचे पालन करणे जिल्हा परिषदेस बंधनकारक राहील.

३२.योजनेंतर्गत किती लोकांना रोजगार उपलब्ध झाला याची नोंद ठेवावी.

३३.योजना कालमर्यादेत पूर्ण करणे बंधनकारक असल्याने योजने करिता कोणतेही एस्कलेशन चार्जेस अनुज्ञेय नाहीत.

३४.योजनेंतर्गत मंजूर कामांच्या निविदा हया शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विहित प्रक्रियेचा अवलंब करुन स्विकाराव्यात. तसेच प्रकल्पांतर्गत मंजूर किंमतीपेक्षा जास्त किंमतीच्या निविदा स्विकारण्यात येऊ नयेत.

३५.ठेकेदाराने विहित वेळेत काम पूर्ण न केल्यास त्यांच्यावर दंड आकारण्याची तरतूद ठेवण्यात यावी.

३६.योजनांतर्गत झालेल्या सर्व खर्चाचा ताळमेळ वेळोवेळी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई व तसेच महालेखाकार कार्यालय, मुंबई/ नागपूर यांच्या कार्यालयाशी घालण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची असेल.

३७.योजना पूर्ण झाल्यावर भविष्यात नदीच्या उपयोगाबाबत व वापराबाबत किंवा नदीसंदर्भात कोणतीही नवीन कामे हाती घ्यावयाची झाल्यास त्यास प्रथम राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३८. नदीच्या क्षेत्राबाबत, मालकीबाबत, राबविण्यात येणा-या कामाच्या गुणवत्तेबाबत तसेच Surface floating wetland beds बाबत वा इतर संबंधित बाबींबाबत भविष्यात काही न्यायालयीन वा अन्य बाबी उदभवल्यास संबंधित अधिकारी तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक, जि. नाशिक सर्वस्वी जबाबदार राहील.

३९.उपरोक्त अटींव्यतिरिक्त राष्ट्रीय नदी संवर्धन संचलनालयाने नदी संवर्धन योजनेतंर्गत प्रस्तावाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील नियम व अटींचे पालन करणे बंधनकारक राहील.

४०.राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत सचिव स्तरावरील प्रदत्त समितीच्या दिनांक ३०/०१/२०२४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील अटींचे व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT,
2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.18 11:18:23 +05'30'

**(सु.कि.निकम)**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**